**अर्थसंकल्पीय अनुदान २०१६-१७ मागणी क्र. वाय-०७ , ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज ( योजनेतर )**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयूडी-२०१५/प्र.क्र.२७९/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: २२ मार्च २०१७

वाचा -

१) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८१/ अर्थ-३, दि.२०.४.२०१६
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता शासन निर्णय, समक्रमांकः** दि. २२.८.२०१६
३) **शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः** अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/ अर्थ-३, दि.८.२.२०१७

प्रस्तावना -

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ च्या शासन परिपत्रकास अनुसरुन भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेस " ७६१०- शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज" या लेखाशीर्षाखाली वित्तीय वर्ष २०१६-१७ च्या एकुण वार्षिक अनुदानापैकी ८०% अनुदान दिनांक २२.८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजुर व मुक्त करण्यात आले आहे. वित्त विभागाने संदर्भ क्र.३ च्या शासन परिपत्रकान्वये योजनेतर खर्चाची मर्यादा ९० % इतकी विहित केली आहे.

२. सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पाणी पुरवठा विभाग (खुद्द) व पाणी पुरवठा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणे अंतर्गत कार्यरत अधिकारी /कर्मचा-यांना कर्ज इ.वरील खर्च भागविण्यासाठी "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज "या लेखाशीर्षाखाली पाणी पुरवठा विभागास १,०६,०८,००० ( रु. एक कोटी सहा लाख आठ हजार मात्र ) इतकी एकत्रित तरतूद मंजुर करण्यात आली आहे आणि या अनुदानापैकी ७० टक्के अनुदान रु.७४,२५,६०० ( रुपये चौ-याहत्तर लाख पंचवीस हजार सहाशे मात्र ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकरिता आहे. वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ च्या परिपत्रकातील सुचनेनुसार सन २०१६-१७ साठी ८० टक्के मर्यादेत दिनांक २२.८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कर्मचा-यांसाठी रु. ५९,४०,८८० इतके अनुदान भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेला उपलब्ध करुन देण्यात आले आहे. वित्त विभागाच्या दिनांक ८.२.२०१७ च्या परिपत्रकानुसार "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज" या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झालेले अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा , पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पाणी पुरवठा विभाग (खुद्द) व पाणी पुरवठा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणे अंतर्गत अंतर्गत कार्यरत अधिकारी /कर्मचा-यांना कर्ज इ.वरील खर्च भागविण्यासाठी "७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्ज "या लेखाशीर्षाखाली पाणी पुरवठा विभागास १,०६,०८,००० ( एक कोटी सहा लाख आठ हजार मात्र ) इतकी एकत्रित तरतूद मंजुर करण्यात आली आहे. आणि या अनुदानापैकी ७० टक्के अनुदान रु.७४,२५,६०० ( रुपये चौ-याहत्तर लाख पंचवीस हजार सहाशे मात्र ) भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकरिता आहे. वित्त विभागाच्या दि.२०.४.२०१६ च्या परिपत्रकातील सुचनेनुसार सन २०१६-१७ साठी ८० टक्के मर्यादेत दिनांक २२.८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील कर्मचा-यांसाठी रु. ५९,४०, ८८० इतके अनुदान भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेला उपलब्ध करुन देण्यात आले आहे. वित्त विभागाच्या दिनांक ८.२.२०१७ च्या परिपत्रकानुसार" ७६१०- शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे " या लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झालेले अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना या शासन निर्णयाद्वारे मंजुर व मुक्त करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपशीर्ष | सन २०१६-१७ करिता ७६१०- अंतर्गत मंजुर तरतूद | सन - २०१६-१७ करिता भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेसाठी मंजुर तरतूद | माहे एप्रिल ते डिसेंबर २०१६ या नऊ महिन्यांच्या कालावधीसाठी ८०% मर्यादेपर्यंत उपलब्ध करुन दयावयाचे अनुदान | ८.२.२०१६ च्या वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार उपलब्ध करुन दयावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २०१- घरबांधणी अग्रिम (७६१० १५८४) | ७३,५०,००० | ५१,४५,००० | ४१,१५,५०० | ५,१४,५०० |
| २ | २०२- मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिम (७६१० १५९३) | २२,००,००० | १५,४०,००० | १२,३२,१०० | १,५४,००० |
| ३ | २०३- इतर वाहन खरेदी अग्रिम (७६१० १६०१) | ८,००० | ५,६०० | ४,४८० | ८०० |
| ४ | २०४-वैयक्तिक संगणक खरेदीसाठी अग्रिम ( ७६१० १९४२) | १०,५०,००० | ७,३५,००० | ५,८८,८०० | ०० |
| | **एकुण अनुदान** | **१,०६,०८,०००** | **७४,२५,६००** | **५९,४०,८८०** | **६,६९,३००** |

२. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च होईल याबाबत दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१५१६१०९६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.22 12:40:38 +05'30'

**चेतन निकम**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
४. उप अभियंता ( यां) , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई /२- नागपूर ( लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प १६ ( २ प्रती)
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती पापु-१५